**<u>श्रीक्षेत्र जेजुरी गड विकास आराखडा</u>**
**शासन सहभागात सुधारणा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१२/प्र.क्र.५/का.१४४४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १० सप्टेंबर, २०१४.

**<u>वाचा :-</u>**

१.शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१०/प्र.क्र.१०५/का.१४४४, दि.२२ फेब्रुवारी, २०११.

२.जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्रमांकः नियोजन/नि-१०/जेजुरी/११-१२/२१८,दि.१.२.२०१३.

**<u>प्रस्तावना :-</u>**

श्रीक्षेत्र जेजुरी गड विकास आराखड्याबाबतच्या उपरोक्त शासन निर्णयातील अ.क्र. १ व २ येथे दर्शविलेल्या कामांना शासनाने निधी देऊन त्यांचा समावेश आराखड्यात करण्यात यावा, अशी विनंती उपरोक्त पत्रान्वये जिल्हाधिकारी, पुणे यांनी केली आहे. त्यानुसार ₹१८०.७८ लक्ष खर्चाची कामे देवस्थानाकडून करण्याऐवजी शासन निधी स्त्रोतामधून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

जिल्हाधिकारी, पुणे यांनी सादर केलेल्या उपरोक्त पत्रानुसार, शासन निर्णय दिनांक २२.२.२०११ मधील अ.क्र. (१) मुख्यमंदिर सभामंडप, तटबंदी, छज्जा व अनुषांगिक इमारतीचे वॉटर प्रुफिंग करणे (२) पालखी मार्ग व उत्तर बाजूर दगडी पेव्हींग करणे या कामांना देवस्थानाकडून निधी उपलब्ध करण्याऐवजी शासन निधी स्त्रोतामधून करण्यास व त्यासाठी होणाऱ्या एकूण ₹१८०.७८ लक्ष खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरहू कामाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.:-

(₹ लाखात)

| अ.क्र. | कामाचे नाव | कामाची किंमत |
|---|---|---|
| १ | मुख्यमंदिर सभामंडप, तटबंदी, छज्जा व अनुषांगिक इमारतीचे वॉटर प्रुफिंग करणे | ४५.७६ |
| २ | पालखी मार्ग व उत्तर बाजूर दगडी पेव्हींग करणे | १३५.०२ |
| | **एकूण** | **१८०.७८** |

२. वर नमूद केलेल्या कामांना प्रशासकीय मान्यता जिल्हाधिकारी, पुणे यांनी द्यावी. तसेच आराखड्यातील इतर कामांप्रमाणे या कामांचे नियंत्रण जिल्हाधिकारी, पुणे यांनी करावे. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, पुणे हे कार्यान्वयीन यंत्रणा असतील.

३. आराखड्यातील सदर कामांवरील खर्च लेखाशिर्ष "मागणी क्र.ओ-८, मुख्य लेखाशिर्ष ३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनसाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००) (०४) श्रीक्षेत्र जेजुरी तीर्थक्षेत्र विकास कार्यक्रम (३४५२ २८११), २७ लहान बांधकामे, योजनातंर्गत (दत्तमत)" याखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०१६०१३८४३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Vithal Malandkar

Digitally signed by Hemant Vithal Malandkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hemant Vithal Malandkar
Date: 2014.09.10 15:56:44 +05'30'

**( हे.वि.मालंडकर )**

सह सचिव

प्रत,

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) जिल्हाधिकारी, पुणे.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे.
८) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई.
९) अध्यक्ष, श्रीक्षेत्र जेजुरी गड देवस्थान समिती, जेजुरी, ता. पुरंदर, जि.पुणे.
१०) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४, मंत्रालय,मुंबई.

*************